कार्यकारी अभियंता (यांत्रिकी) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या मुदतपुर्व /विनंती बदल्या.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस ११२५/प्र.क्र.१७२(भाग-३) (२)/आ (वर्ग-१)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
**दिनांक : ३० मे, २०२५.**

**शासन आदेश :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतुदीनुसार जलसंपदा विभागातील खालील तक्यात नमूद कार्यकारी अभियंता (यांत्रिकी) संवर्गातील अधिकाऱ्यांची प्रशासकीय निकड विचारात घेऊन, नागरी सेवा मंडळाच्या शिफारशीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने बदलीने पदस्थापना स्तंभ क्र.४ येथे दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहेत:

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | बदलीने नियुक्तीचे पद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.मोहम्मद अय्युब मो. कुद्दुस | कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग, अमरावती | **उप अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, नागपूर** या श्री.पठाण यांच्या नियतकालीक बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर बदलीने पदस्थापना |
| २. | श्री.ईश्वरकुमार मधुकरराव आत्राम | कार्यकारी अभियंता, विष्णूपूरी पंपगृह विभाग, नांदेड | **कार्यकारी अभियंता, प्रमुख द्वार उभारणी पथक क्र.२, नागपूर** या श्री.मुठाळ यांच्या नियतकालीक बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर बदलीने पदस्थापना |
| ३. | श्री.दत्तात्रय रामराव सावंत | उप अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ (उ व सं), नांदेड | **कार्यकारी अभियंता, विष्णूपूरी पंपगृह विभाग, नांदेड** या श्री.ईश्वरकुमार आत्राम यांच्या विनंती बदलीने रिक्त होणाऱ्या रदावर बदलीने पदस्थापना |

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | बदलीने नियुक्तीचे पद |
|---|---|---|---|
| ४. | श्री.युगेश जनार्दन पाखमोडे | कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग, बीड | **कार्यकारी अभियंता, उपसा सिंचन यांत्रिकी विभाग क्र.१, भंडारा** या रिक्त पदावर बदलीने पदस्थापना |
| ५. | श्री.मारूती महादेव काकड | कार्यकारी अभियंता, टेंभू उपसा सिंचन यांत्रिकी व विद्युत पथक ओगलेवाडी, ता.कराड जि.सातारा | **सहायक मुख्य अभियंता (यां.), सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजीनगर** या रिक्त पदावर बदलीने पदस्थापना |

२. संबंधित कार्यकारी अभियंता यांनी बदलीने पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे.

३. संबंधीत अधिकाऱ्यास बदलीने पदस्थापनेच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते बदलीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास **doesttclass1.wrd@maharashtra.gov.in** या ई-मेल संकेतस्थळावर त्वरित कळवावे.

४. सदर आदेशामुळे वरील बदलीने पदस्थापना करण्यात येत असलेल्या पदी संबंधित अधिकारी रुजू झाल्यानंतर, संबंधित पदाचा अतिरिक्त कार्यभार यापूर्वी अन्य अधिकाऱ्याकडे सोपविण्यात आला असल्यास, तो आपोआप संपुष्टात येईल.

५. संबंधीत अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

**६. सदर बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती**

**गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.**

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०५३०१९५५२०५३२७ असा आहे. तसेच सदर आदेश जलसंपदा विभागाच्या https://wrd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावरही उपलब्ध करण्यात आलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUHAS BAJIRAO
JADHWAR

Digitally signed by SUHAS BAJIRAO JADHWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=0de66b4d57847be117776aeaf9e53c5b70f1b8d7fdab972d3d1e2c6397e1faa5, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F66717B05E42A313D9839BD11E491F5C5F850C51D1F3CB32930D359D7331FF36, cn=SUHAS BAJIRAO JADHWAR
Date: 2025.05.30 19:56:02 +05'30'

**(सुहास जाधवर)**
**अवर सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई
३. सचिव ( लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), मंत्रालय, मुंबई
४. सर्व कार्यकारी संचालक / महासंचालक, जलसंपदा विभाग.
५. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
६. खाजगी सचिव, मा. मंत्री,जलसंपदा(गोदावरी व कृष्णा खोरे विकास महामंडळ), मंत्रालय, मुंबई.
७. खाजगी सचिव, मा. मंत्री,जलसंपदा (विदर्भ, तापी व कोकण पाटबंधारे विकास महामंडळ), मंत्रालय, मुंबई.
८. मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक
९. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
१०. सर्व अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग
११. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
१२. सर्व संबंधीत अधिकारी
१३. संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१४. सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.